महाराष्ट्र ग्रामदान मंडळास सन २०२२-२३ करिता
सहायक अनुदान देणे.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- बीयुडी-२०२१/प्र.क्र.१३५/ज-१अ**
पहिला मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २९ मार्च, २०२३

संदर्भ- १. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.जीडीएन १०७४/१६०७/ग-२, दि.१४/०५/१९७६.
२. महसूल व वन विभाग, शासन अधिसूचना क्र.ग्रामदान-२०१९/प्र.क्र.६३/ ज-१अ, दि.०९/०८/२०१९.
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४/०४/२०२२.
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२२/प्र.क्र.३७/ब-१,दि.१२/०४/२०२२.
५. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक:- पुनर्वि-२०२२/२२२५-२२३५/प्र.क्र.१३१/ ब-१, दि.१९/१२/२०२२ व दि.१७/०२/२०२३,
६. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक:- बीयुडी-२०२१/प्र.क्र.१३५/ज-१अ, दि.१४/१२/२०२२.
७. महाराष्ट्र ग्रामदान मंडळाचे दि.२१.०३.२०२३ चे पत्र

**शासन निर्णय:-**

उपरोक्त संदर्भाधीन क्र.१, येथील दि.१४.०५.१९७६ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला अनुदान देण्याबाबत अटी व शर्ती विहित करण्यात आल्या आहेत. तसेच, संदर्भाधीन क्र.२, येथील दि.०९.०८.२०१९ च्या अधिसूचनेन्वये मा.श्री.जयवंत गंगाराम मठकर यांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्र ग्रामदान मंडळाची पुर्नस्थापना करण्यात आली आहे. त्यानुषंगाने, संदर्भाधीन क्र.७ येथील दिनांक २१.०३.२०२३ च्या पत्रान्वये, महाराष्ट्र ग्रामदान मंडळाने सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता सहायक अनुदान वितरीत करण्याची विनंती केली आहे.

०२. महाराष्ट्र ग्रामदान मंडळास कार्यकर्त्यांचे मानधन, कार्यालयीन खर्च, कार्यकर्ता प्रशिक्षण व इतर किरकोळ खर्च इत्यादी खर्च भागविण्याकरीता सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पात रु.३०,००,०००/- (रुपये तीस लाख फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली होती. त्यापैकी, संदर्भिय क्र.५ येथील ब-१ कार्यासनाच्या अनुक्रमे दि.१९.१२.२०२२ व दि.१७.०२.२०२३ च्या शासन निर्णयानुसार मागणी क्र. "सी-५ मुख्य लेखाशिर्ष २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागास वर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण यामधून मुख्य लेखाशिर्ष २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण" या लेखाशिर्षात अनुक्रमे रु.५,७०,०००/- व रु.१,८०,०००/- अशी एकूण रु.७,५०,०००/- इतकी रक्कम पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्यात आली. तसेच, संदर्भ क्र.६ येथील दिनांक १४.१२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये, सदर अर्थसंकल्पित निधीपैकी रु.६,३०,०००/-(रुपये सहा लाख तीस हजार फक्त) एवढी रक्कम महाराष्ट्र ग्रामदान मंडळास वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आली होती.

०३. आता, महाराष्ट्र ग्रामदान मंडळास कार्यकर्त्यांचे मानधन, कार्यालयीन खर्च, कार्यकर्ता प्रशिक्षण व इतर किरकोळ खर्च इत्यादी खर्च भागविण्याकरीता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील रु.१६,२०,०००/- (रुपये सोळा लाख वीस हजार फक्त) इतकी रक्कम सी-५-२२२५- महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२२५००६५), १३,कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली तरतूद "आहरण व संवितरण अधिकारी, रोख शाखा" महसूल व वन विभाग यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार/उपकोषागार यांच्याकडे पाठविण्यात येणाऱ्या बिलांसोबत जोडल्या जाणाऱ्या कॉम्प्युटर स्लिपमध्ये गौण/उपशीर्षाच्या संगणक संकेतांकांचा न चुकता उल्लेख करावा.

आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.प्र.शां.पाटील, कक्ष अधिकारी, रोख शाखा, महसूल व वन विभाग यांच्या सहीने व नियंत्रक अधिकारी म्हणून श्री. अ.अ.कोदे, सह सचिव, महसूल व वन विभाग यांच्या प्रतिस्वाक्षरीने याबाबतचे देयक तयार करून अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे पाठवावे.

**०४.** सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला या आदेशाद्वारे मंजूर करण्यात आलेली अर्थसंकल्पीत रु.२२,५०,०००/- इतक्या निधीपैकी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७९ टक्केच्या मर्यादेत म्हणजेच रु. १६,२०,०००/- (रुपये सोळा लाख वीस हजार फक्त) इतकी रक्कम "सी-५-२२२५-अनुसूचित जमाती, इतर मागास वर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण -८०, सर्वसाधारण -८००, इतर खर्च- (००) (००) (०२)- महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२२५००६५), १३,कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकण्यात यावी. सदर रकमेचा रेखीत धनादेश " अध्यक्ष, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ (Chairman, Maharashtra Gramdan Mandal)" यांच्या नावे काढण्यात यावा.

**०५.** अध्यक्ष, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ यांनी सन २०२२-२३ करीता मंजूर वितरीत अनुदानातून केलेल्या खर्चाचा ताळमेळ घालून आणि लेखापरीक्षण करुन, लेखापरीक्षण अहवाल शासनास सादर करावा. तसेच, सदर निधी वितरीत झाल्यानंतर त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

**०६.** महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२२ च्या अनुषंगाने शासन वित्त विभागाने निर्गमित केलेल्या परिपत्रक अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३,दि.०४/०४/२०२२ सोबतच्या परिशिष्टातील बाब.क्र.३ मध्ये नमूद केल्यानुसार प्रस्तुत जुन्या योजनेत्तर योजनेच्या स्वरूपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्याने वित्त विभागाची सहमती आवश्यक नाही.

**०७.** सदर शासन निर्णय निर्गमीत करताना शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम भाग-२, दि.१७/०४/२०१५ भाग पहिला उपविभाग एक अनुक्रमांक-२७, नियम क्रमांक- १४९ मधील अटींचे पालन केले आहे.

**०८.** सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२३०३२९२१५१०५४५१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANJUSHA DATTATRAY SONJE

Digitally signed by MANJUSHA DATTATRAY SONJE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=8e491e40da312b87356d474f3637bdb55dff1aa207b1723030265ad04926cadb, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=14ABD3DD33A977D709D803B6057EB9FE0DE69BD4ACD4BF7CA36CED00F53EA72C, cn=MANJUSHA DATTATRAY SONJE
Date: 2023.03.29 21:57:29 +05'30'

**( मंजुषा सोनजे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. महालेखापाल (लेखापरीक्षा) (लेखा व अनुज्ञयेता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
२. अधिदान लेखा अधिकारी, मुंबई
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव./वि.का.अ., मंत्रालय, मुंबई-३२.
५. अपर सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मुंबई-३२
६. सह सचिव (रोख शाखा), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. सह सचिव (ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

८. सह सचिव (ज-१अ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. अध्यक्ष, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ, ९-१०, प्रथम, हॅप्पी कॉलनी, कोथरुड, पुणे-३०
१०. सचिव, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ, मु.पो.नेहरोली, ता.वाडा, जि.पालघर-४२१३१२.
११. अर्थसंकल्प -४/व्यय-९, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. निवडनस्ती ज-१अ.